# अष्टम खंड

---

## धूम्रवर्णचारित्र

### महावाक्याचे उध्दाटन ० अहं राक्षसाचा गणेशद्वारा पराभव

**सुत** :– एकदां शेषाने शंकराला नमस्कार करून विचारले 'तुम्हीं परात्पर देव असूनही नित्य कोणत्यातरी देवाचे ध्यान व उपासना करता तें कां?' तेंव्हा शंकराने उत्तर दिले: 'अहंब्रह्मास्मि (मी ब्रंह्म आहे) या महावाक्यांत ब्रह्म व अहंवृत्ति ही दोन्ही एकाच ठिकाणी एकस्वरूपी होतात. अशी वृत्ति होऊन अहंवृत्तिचा व ब्रह्माचा लय ज्या परब्रह्मामध्ये होतो ते परब्रह्म. 'मी' नाही व ब्रह्म नाही, असे ज्ञान ज्या योगाने होते तें हें महावाक्य आहे आणि त्याचे चिंतन मीं रोज करतो.' शेषास शंकराच्या बोलण्यावरून कांहीं बोध झाला नाहीं म्हणून शंकराने त्याला पुढील कथा सांगितली. 'एकदां कर्मस्वामी जो सूर्य त्याला गर्व झाला की, मी कर्मकर्ता, माझ्यापासूनच ब्रह्मा, विष्णु, शंकरादिकांची उत्पत्ति, ईश्वरासकट सर्व जगत् कर्माधीन, म्हणून मीं सर्व श्रेष्ठ आहे.' गर्वाचे घर खाली! तेंव्हा असा चमत्कार झाला की. त्याला एक शिंक आली व तिच्यापासून महाकाय, विशालनयन व बलयुक्त असा एक सर्वांग-

सुंदर पुरुष उत्पन्न झाला. शुक्र तेथेच होता त्याने त्याचे ' अहं ' असे नाव ठेवून त्याला गणेशमत्राची दिक्षा दिली; आणि ' अहं ' ला तपश्चर्या करावयास सांगून आपण स्वाश्रमीं निघून गेला. ' अहं ' ने ह्या मंत्राचा जप करून तपश्चर्या केली आणि गणपतीस प्रसन्न करून घेऊन या वशचैतन्यापासून मला मृत्यु नसावा, त्रैलोक्याचे राज्य असावे, आरोग्य असावे व माझे अस्त्र अमोघ (नित्य जय देणारे) असावे. ' असे वर मागितले. मग ' तथास्तु ' असे विघ्नराजाने म्हटल्यावर ' अहंला ' अति आनंद झाला; आणि गणपति अंतर्धान पावल्यावर ' अहं ' शुक्राचार्यांकडे गेला आणि त्याला सर्व वृत्तांत सांगून त्याने त्यांच्याकडून शाबासकी मिळवली. पुढे लवकरच त्रैलोक्यांतील सर्व राक्षस एकत्र केले आणि विषयप्रियनामक नगरीत राज्याभिषेक करवून घेऊन ममता नामक एका सुंदर कुमारीशी लग्न केले. कांही काळ लोटल्यावर चतुरंग सेना सिद्ध करून त्याने पृथ्वीतील क्षत्रियांचा पराभव केला व तेथील सर्व राजांस आपले मांडलिक केले. नंतर स्वर्ग व पाताळ या लोकांत जाऊन व तेथील अधिपतींचा पराभव करून ब्रह्मदेव, विष्णु, शंकर, देवी यांस अहंने आपल्या अमोघ अग्निअस्त्राने भाजून काढले व सर्वत्र त्याने आपली सत्ता प्रस्थापित केली. अर्थातच देवांस वनवासाचा व कंदमुळे भक्षण करण्याचा प्रसंग प्राप्त झाला. अहंने या पळून गेलेल्या देवांच्या स्थानांवर आपले हस्तक नेमले आणि भूलोकी आपण सर्व प्रकारच्या धर्मविहित व धर्मनिषिद्ध व्यसनांमध्ये सर्वथा आसक्त झाला; इतकेच नव्हे तर सर्व भूलोकावर राहणाऱ्या जीवांच्या हातून होणाऱ्या सत्कर्मांचा लोप करून यज्ञयाग, स्वाहा, स्वधाकार यांस नामशेष करिता झाला. झाला. बिचारे देव ! ते अनाथनाथ आणि दीनवत्सल

जो धूम्रवर्ण त्याला अनन्यभावाने शरण जाऊन हजार वर्षे त्याची एकनिष्ठ तपश्चर्या केली. या त्यांच्या जगत्कल्याणकारी तपश्चर्येमुळे परमेश्वराला संकट पडून तो प्रसन्न झाला, आणि गणपति धूम्रवर्णरूपाने (धुरासारखा आहे वर्ण ज्याचा असा) प्रकट झाला आणि देवांचे इच्छित मनोरथ पूर्ण करण्याचे अभिवचन त्यांस त्याने दिले. इकडे अहं राक्षसाला अनेक प्रकारचे अपशकून त्रास देऊं लागले. वृद्धांचे बोलणे त्यास आवडेना. नारदमुनींच्या उपदेशाचा त्याने धिःकार केला; आणि देवांवर व देवेश्वरावर हल्ला करण्याकरता प्रथम आंपणच स्वसैन्यासह बाहेर पडला. धूम्रवर्णाने प्रकट होऊन आपले पाशनामक अस्त्र दैत्यांवर सोडले, तेव्हा काय विचारतां! हजारो राक्षस त्या अस्त्राला बळी पडले त्याचे मोटमोठाले सचिव पाशाच्या तेजाने दग्ध झाले आणि अहंचे जे अमोघ अग्न्यस्त्र त्यालाही पाशास्त्राने जाळून भस्म केले. हे पाहून मात्र अहं राक्षस भ्याला. तो पळून आपल्या नगरीमध्ये जाऊन बसला आणि शुक्रास बोलावून आणून. 'माझे अमोघ अस्त्र आज मोघ (व्यर्थ) झाले!' असे ह्मणून शोक करूं लागला. शुक्राने त्याला गणेशब्रह्माचे, त्याच्या स्वरूपाचे, त्याच्या मायेचे आणि त्याच्या योगाचे ज्ञान सांगून पुढे म्हणाला की 'तूं त्याला शरण जा, म्हणजे तुझे कल्याण होईल, जीव आपापल्या धर्माने जोपर्यंत चालतात तोपर्यंत त्याचे कल्याणच होत असते. अधर्माने मात्र केव्हांही पाहिले तरी अव्यवस्थाच उत्पन्न होते आणि ती मोडण्याकरता परमेश्वराला अंशावतार अथवा पूर्णावतार घ्यावा लागतो. तेव्हां स्वतःचे कल्याण तुला हवे असेल तर तूं परमेश्वराला शरण जा.' हा उपदेश 'अहं' असुराला आवडला. लागलीच 'ॐश्री' या ब्रह्मवाचक अक्षरांनी प्रारंभ केला आहे अशा

गणेशमंत्राची शुक्रगुरूंकडून दीक्षा घेऊन त्याने अत्युग्र तपश्चर्या केली; आणि गणपतीला प्रसन्न करून त्यापाशी अखंड 'भक्ति' मागितली शेवटी विघ्नेशाने त्याला आज्ञा केली, 'सकाम कर्म करणाऱ्या जीवाच्या अंतःकरणांत अहं व ममता या स्वरूपाने रहात जा आणि माझी जे निष्कामभक्ति करणारे माझे भक्त आहेत त्यास बिलकुल त्रास देऊं नको.' ही विघ्नराजाची आज्ञा घेऊन गणपतीचा त्याने नमस्कारपूर्वक निरोप घेतला. इकडे 'अहं' च्या त्रासापासून मुक्त झालेल्या देवांनी परमेश्वराची पुष्कळच स्तुति केली; परमभक्तीने त्याचे भजनपूजन केले आणि 'आता स्वधर्म स्थापना झाली आहे, आमचे व विश्वाचे कल्याण करवून दाखविण्याचा समय प्राप्त झाला आहे, आणि वर्णाश्रमाची पुनः संस्थापना झाली आहे. ही सर्व स्थिति अशीच नित्य राहो.' असे त्यांनी देवाजवळ मागणे मागितले. विघ्नराज अंतर्धान पावल्यावर देवांनी त्याची कुरुक्षेत्रामध्ये मूर्ति स्थापन केली, आणि त्याचा भक्तिसंप्रदाय वाढविला. मयूरक्षेत्राप्रमाणेच सर्व देवदेवता, तीर्थे व सर्व सिद्ध येथे राहतात. येथे भाद्रपद शुद्ध चतुर्थीला वार्षिक उत्सव होतो

## अहंता व माया

**सूत** :– शौनकादि ऋषिनो ! तुम्हांस मागे सांगितलेच आहे की, शंकर, विष्णु, ब्रह्मदेव इत्यादि सर्व ब्रम्हे परमेश्वराचेच म्हणजे धूम्रवर्णाचेच सर्व अंशावतार आहेत. या सर्वांत व सर्व जीवांत अहंचा (मीपणाचा), ममतेचा जो अभिमान असतो त्याचा नाश करावयाचा असतो, शिवाय ही गोष्ट लक्षांत ठेवावयाची आहे की, सर्व जीव व जीवेश्वर शिव हे स्वतःच्या संबंधाने सर्वथा शक्तिशून्य

आहेत. कर्तुम्, अकर्तुम्, अन्यथाकर्तुम्, सामर्थ्य एका गणेशरूपी परमेश्वरामध्येच आहे, हे रहस्य जाणावे. माया ही तीन प्रकारची आहे. तिच्यावर जय मिळवावयाचा असेल तर तुरीय ( चतुर्थ ) जे गणेशब्रह्म त्याच्या आश्रयास गेले पाहिजे, हा सिद्धांत समजला तेंव्हां शंकराला ब्रह्मदेवाच्या वराने उन्मत्त झालेला जो त्रिपुरासुर त्याचा वध करण्याचे सामर्थ्य प्राप्त झाले.

## बाणासुराचा श्रीकृष्णद्वारा पराभव

सूत :– मुनिहो, ऐका: बलिपुत्र बाण हा परम धार्मिक असून शिवभक्त होता. त्याने तपश्चर्या करून शंकराकडून आपल्याला सहस्त्र बाहु मागून घेतले होते; पुढे त्याने सर्व विष्णुप्रमुख देवांचा पराभव केला हे खरे. पण वर्णाश्रमधर्म कायम ठेवून देव, मनुष्य, राक्षस या त्रिवर्गात स्वधर्माने चालण्यास उत्तेजन देऊन त्यांच्या त्यांच्या लोकांत कायम ठेवले, असो; शंकराची पूजा करण्याकरता बाणासुर नित्य कैलासाला जात असे, शंकरही त्याच्याकडे कव्हां केंव्हां त्याच्या नगरांत रहावयास जात असे. बाणासुर स्वतः कट्टर शंकरभक्त होता, तेंव्हां आपल्यास सर्वथा पूज्य जो शंकर त्याला सोडून ‘ मी केव्हांही गणपतीची किंवा अन्य देवांची भक्ति करणार नाही ’ असा त्याने निश्चय केला. देवपंचायतन माहीत असूनही तो केवळ शंकराची भक्ति करी. ‘ आपण मोठे बलवान आहो ’ असाही गर्व त्याला झाला होता. पुढे एकदा शंकरांनी त्याला ‘ वर माग ’ म्हटले, तेंव्हा ‘ माझ्या हजार बाहुंशी युद्ध करणारा एखादा योद्धा उत्पन्न कर ’ असा वर मागितला; तेंव्हां शंकर रागावला आणि ‘ तूं राज्यभ्रष्ट होशील व तुझे हजार बाहु यादव कुलोत्पन्न वासुदेव तोडेल, ’

असा शाप देऊन शंकर कैलासाला निघून गेला. यामुळे खिन्न झालेल्या बाणासुरास उपदेश करून शुक्राने त्याकडून गणेशाची भक्ति करविली, आणि त्याने पुनः ‘ राज्यावर प्रस्थापित होशील ’ असा गणपतीकडून वर मागून घेतला. त्या दिवसापासून तो गणेशस्मरण-पूर्वक शंकराची उपासना करीत असे. बाणासुराला उषा या नांवाची एक कन्या होती. तिला अनिरुद्ध नामक कृष्णाच्या नातवाने तिच्या स्वप्नात येऊन वरले होते. त्याच अनिरुद्धाला चित्रलेखा नामक उषेच्या सखीने तिच्या मंदिरात आणून तिचा व अनिरुद्धाचा गांधर्व-विवाह लावला होता. प्रद्युम्नाला ह्मणजे अनिरुद्धाच्या बापाला हे अनिरुद्धाचे प्रयाण नारदाने कळविले. तेंव्हा सर्व द्वारकेतील यादवास राग आला. त्यांनी गणेशस्मरण करून बाणाच्या शोणित नगरीवर हल्ला करण्याचा व अनिरुद्धास सोडविण्याचा संकल्प करून स्वारी केली; या युद्धांत कृष्णाने बाणासुराचा पराभव करून त्याचे हात तोडले. शेवटी त्याचे संरक्षण करण्यासाठी शंकर धावून आला, तेव्हां कृष्णाने त्यावर झोप येणारे अस्त्र टाकून शंकराला मोहित केले. इकडे बाणाचे दोन हात मात्र शिल्लक राहिले. कृष्णालाही ते हात तोडता येईनात. कारण गणपतीच्या वराने ते दोन्ही हात सुरक्षित होते. शंकरावरील मोहिनी काढून घेतल्यावर कृष्णाने शंकरास आलिंगन दिले आणि उषा अनिरुद्ध यांचे विधिपूर्वक लग्न लावून व बाणास शोणित नगरीचे राज्य देऊन कृष्ण आपल्या पुत्रपौत्रांसह द्वारकेला परत गेला.

## गणपतीला तांबडा रंगच प्रिय कां ?

**सूत :–** शौनका ! ‘ गणपतीला तांबडा रंगच कां प्रिय असतो ? तो सर्वव्यापी असतां आणि सर्ववर्णपूर्ण व सर्ववर्णशून्य असतां, त्याला

एकच रंग कां संमत होतो ?' असा जो तुम्हीं प्रश्न विचारला, त्याचें उत्तर हे कीं, पूर्वी पांढरा, काळा, तांबडा, पिंवळा, निळा हेच कायते मुख्य रंग होते. यांच्यात भेदाभेद करून व संमीलन (मिसळणे) करून अनंत रंग उत्पन्न होतात. या सर्वांनी 'आमच्या स्वरूपाचे परमेश्वराने असावे, त्याला आमचा रंग असावा' असा संकल्प करून या सर्व रंगांनी तपश्चर्या केली व परमेश्वरास प्रसन्न करून घेऊन इष्ट वर प्राप्त करूनही घेतले. परमेश्वराने सर्व चराचरातील वस्तूंना भिन्न भिन्न रंग असतील असे केले. व आपणही कश्यपपुत्र असता निळा, मयूरेश अवतारात पांढरा, वरेण्यसुत होता तेंव्हां तांबडा, धूम्रवर्ण असता श्याम इत्यादि भिन्न वर्णांचे अवतार घेतले. पुढे एकट्या रक्तवर्णाने परमेश्वराची आणखी तपश्चर्या केली आणि 'आपण नेहमी रक्तवर्ण आणि रक्तप्रिय अशा वर्णांचे असावे, म्हणजे मी सर्व रंगांत श्रेष्ठ होईन' असा वर मागून घेतला व मिळविला.

## कलियुग वर्णन

**सूत** :– शौनकादिमुनिहो ! द्वापार युग संपल्यानंतर पाप ज्यांत अत्यंत असते, अशा या कलियुगाला आरंभ होतो. ह्या वेळी विष्णु हा बुद्धाचा अवतार घेऊन गणपतीचे चिंतन करीत राहतो. बौद्ध शास्त्र हे वर्णाश्रमधर्माला नाहीसे करणारे आहे, हे तुम्ही जाणता. या युगांत बुद्धिपति गणपति देवांच्या व ब्रह्माच्या अंतःकरणांत राहून चित्तपंचकास प्रवृत्त करतो, म्हणून त्याला विनायक म्हणतात विनायक म्हणजे नायकशून्य अथवा स्वेच्छाचारी परमेश्वर होय. या देवाचे ज्ञान झाले असता जीव मोहशून्य होतो. या युगात शरीराला कष्ट देऊन बुद्धिला संताप देणारे कर्म करण्याचे कारण

नाही. 'मी ब्रह्म आहे. असे ध्यान मात्र निरंतर असावे. जीवहिंसा व वृक्षहिंसा करू नये. मनःपूत शुद्ध मनाला शुद्ध वाटेल असे आचरण करावे. हे आचरण खरोखर पाहतां अवधूताचे म्हणजे संसाराचा परित्याग करून शुद्ध चित्त झालेल्या मुमुक्षूचे, संन्याशाचे अथवा विरक्ताचे आहे, असे विहित असतांही या कलियुगात बुद्धिप्रेरित मोहाने हे आचरण सामान्य व संसारी जनांनीही स्वीकृत केले आहे. कारण येथे धर्माधर्माने होणारा त्रास चुकविण्याची सर्वांची प्रवृत्ति आहे. या अधर्म प्रभावाचा नाश करण्याकरितां व पापनिवृत्ति करण्याकरिता देवदेवेश्वर गणपति हे देवांच्या विनंतीवरून अवतार घेणार आहेत व जीवांच्या अंतःकरणांत जी पापवृत्ति असते तिचाही नाश करणार आहेत.

## चार युगांचे वर्णन

सूत :– मुनिहो! तुरीय देहांत राहणारे ब्रह्म ते कृतयुग, सुषुप्तीच्या देहांतील त्रेता, स्वप्न देहांत राहणारे द्वापार आणि जागृत देहांत राहणारे ब्रह्म हे कलियुग अशी युगव्यवस्था व जीवस्थिति यांची सांगड आहे, पण येथे सर्व देहांतरी असणारा आत्मा एकच आहे माया मात्र देहभिन्नतेने निरनिराळ्या स्वरूपाची असल्यामुळे तिचे स्वरूप निरनिराळे असते, असे कांहीं तत्त्वज्ञ ह्मणतात. तसेच ध्यान हे कृतयुग, यज्ञ त्रेता, आचार द्वापार आणि देहविषय हा कलि असे दुसरे तत्त्वज्ञ म्हणतात. यांच्या मते ज्ञान आणि ध्यान हे म्हणजे कृत व त्रेतायुगे चालू असतां येथे म्हणजे त्या युगांत एकच वर्ण आणि एकच आश्रम असतात. यज्ञकालांत मात्र भिन्नभिन्न वर्णाश्रमांची व्यवस्था सुरू होते. पण वस्तुस्थिति अशी आहे की,

कृतयुगांत सात्विक स्वधर्माला योग्य आणि जीवाला मोक्षदायी असेच आचरण होते. त्रेतायुगात भुक्ति ( भोग ) व मुक्ति या उभयतांची व या प्राप्त करून देणाऱ्या कर्माची आवड जीवास असते. द्वापारात धर्माचरण करून विषयसौख्य मिळवावे हीच काय ती आवड जीवास असते आणि कलियुगांत पापपुण्याचा विचार न करता केवळ देहसुखार्थच कर्म करण्याची प्रीति असते. कृत युगात लक्षजीवांत एक पापी, त्रेतामध्ये लक्ष जीवांत शंभर पापी, द्वापारामध्ये लक्षजीवात दहा हजार पापी आणि कलियुगात सर्वच पापी अशी व्यवस्था आहे व असावयाची. कलियुगात धर्माधर्म विचार केवळ मोहकृत असतो. कृतयुग चालू असता बाकीची सर्व युगें कृताच्या ताब्यात असतात व त्याची जशी आज्ञा असेल त्याप्रमाणे वर्तन करतात. अशीच प्रत्येक युगकालांत बाकीच्या सर्व युगांची व्यवस्था आहे. म्हणजे कलियुगकाली बाकीची सर्व युगें कलीच्या स्वाधीन असतात. असो; कलियुगामध्ये जर सिद्धि प्राप्त करून घ्यावयाची असेल तर विहित आचाराला प्रारंभ करावयाच्यापूर्वी जीवाने गायत्रीचा जप केला पाहिजे. हविष्यान्नाचे सेवन करून एकभुक्ति, ब्रह्मचर्य, सत्य-भाषण, मनःसंयमन, अंतर्बाह्यशुद्धि अशा व्यवस्थेने जर विहित कर्म केले तर कर्मसिद्धि प्राप्त होईल, इतकेच नव्हे तर चौपट फळ प्राप्त होईल.

## वज्रपंजर मंत्र रहस्य

सूत :– मुनिहो ! वर्षाच्या बारा महिन्यात जी जी विहितकर्मे आपण करतो, ती आदित्याच्या साक्षीने व ब्रह्मार्पण बुद्धीने केली तर उत्तम प्रकारची सिद्धि जीवास प्राप्त होते. मळमासांत ( अधिक

मासात ) संक्रांत नसते म्हणून त्या महिन्याची देवता गणपती असते. ह्या मासांतील कर्म गणेशसाक्षीने व गणेशार्पणबुद्धिने केले असता ते कर्म, इतर महिन्यात न मिळणारी उत्तम उत्तम फले देणारे होते. प्रत्येक महिन्यात मुमुक्षुने अरुणोदयकाली स्नान, संध्या, ब्रह्मयज्ञादि कर्मे, गणेशपूजा, हविष्यान्नभक्षण, एकभुक्ति (एक वेळ भोजन करणे ), सत्यभाषण इत्यादि कर्मे आपापल्या अधिकाराप्रमाणे केली तर उत्तम प्रकारची सिद्धि प्राप्त होते. गणेशभक्तांनी शमीमंदिरांची पूजा करणे ( त्यांना पाणि घालणे, प्रदक्षिणा घालणे, गाईची शुश्रूषा करणे इत्यादि ) अवश्य आहे. मत्स्यरूप घेऊन विष्णूस शंखासुर मारता आला त्याचे मुख्य कारण हे होते की, विष्णूने बदरिकाश्रमी कार्तिकमासी व्रतस्थ राहून गणेशाचे आराधन केले होते. याचप्रमाणे सोमदत्त नावाचा ब्राह्मण गणेशभक्ति करीत असता व मौन धारण करून गणेशसेवा करीत असता एकदा त्याच्या पूजाद्रव्यांतून दूर्वा, शमी व मंदारपुष्पे अकस्मात् नाहीशी झाली ! तेंव्हा तो आपल्या अंगाची त्वचा व शिखा परमेश्वरास अर्पण करण्याच्या बुद्धिने स्वशिरच्छेद करण्यास तयार झाला, तेंव्हा गणपति प्रसन्न होऊन त्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण करते झाले. सोमदत्ताला गणेशदर्शन झाले ते कार्तिक महिन्यात झाले. अशी सिद्धि केवळ ब्राह्मणांसच प्राप्त होते असे नाही, तर कोणत्याही वर्णातील व कोणत्यांही आश्रमांतील जीवाने व्रतस्थ राहून वरीलप्रमाणे गणेशपंचकाचा स्वीकार केला आणि गणेशभक्ति केली तर सर्व प्रकारची सिद्धि प्राप्त होते. शंकराला अंधकासुराचा वध करता आला तो केवळ त्याने मार्गशीर्ष मासांत गणेशपंचकपूर्वक गणपतीची आराधना केली होती म्हणून होय. त्यावेळी गणपतीनी शंकराला ' वज्रपंजरा ' चे रहस्य सांगितले

होते. ते असेः- ' 'हृदयात राहणारा बिंदुरूप वक्रतुंड माझ्या चार देहांचे संरक्षण करो, सोहंस्वरूपी एकदंताने देहमोहयुक्त जो मी त्या माझे रक्षण करावे; बोधानंदरूप महोदर हा, माझ्या ज्ञानाचे संरक्षण करो, सांख्येश गजानन माझ्या सांख्यज्ञानाचे रक्षण करो, लंबोदर हा असन्मायेमध्ये राहणारा जो मी त्या माझे रक्षण करो, परात्परविकट हा सद्वस्तूमध्ये राहणारा जो मी त्या माझे रक्षण करो, समात्मक विघ्नराज आनंदामध्ये राहणारा जो मी त्या माझे रक्षण करो, सुखरूप धूम्रवर्ण हा अव्यक्ताच्या मोहात राहणारा जो मी त्या माझे रक्षण करो, स्वरूपधारी गणेश स्वसंवेद्याच्या मोहात राहणारा जो मी त्या माझे रक्षण करो, निवृतिरूप गणेश्वर हा अयोगाच्या मोहांत राहणारा जो मी त्या माझें रक्षण करो, सिद्धिबुद्धियुक्त गणाधीश हा, योगाच्या मोहांत राहणारा जो मी त्या माझें रक्षण करो, याचप्रमाणे दशदिशांस राहणाऱ्या ज्या गणपतीच्या विभूति आहेत त्या माझ संरक्षण करोत!' असा मंत्र मार्गशीर्षमासांत नित्य म्हटला म्हणजे गणेशरूपी वज्रपंजर सिद्ध होऊन तो सर्व विघ्नांचे सर्व बाजूंनी निवारण करतो. हा वज्रपंजररूपी मंत्र गणपतींनीं शंकराला अंधकारासुराच्या वधापूर्वी सांगितला होता तसेच एका साधु नांवाच्या भारद्वाजकुलोत्पन्न ब्राह्मणानें मार्गशीर्ष मासीं व्रतस्थ राहून गणेशाची विधियुक्त आराधना केली. एके दिवशी साधु हा एका ब्राह्मणास इच्छा भोजन घालीत असतां कितीही अन्न वाढले तरी त्याचे समाधान होईना, म्हणून त्याला दूर्वारस गणपतीचे स्मरण करून वाढता झाला आणि तो ब्राह्मण तृप्त झाला. त्याच वेळी गणपतीचा साक्षात्कार होऊन त्या साधु ब्राह्मणाचे सर्व मनोरथ पूर्ण झाले. याचप्रमाणे माघ मासात विष्णुप्रमुख

देवांनी व देवलप्रमुख सर्व ऋषींनी गणेशाचे आराधन केले, म्हणून विष्णूला सूर्यवरप्रदानाने उन्मत्त झालेल्या विरोचनाचा वध मोहिनीचे रूप घेऊन करतां आला. हा वध करणे अवघड होते. कारण सूर्याने विरोचनाला आपला मुकुट देऊन असे सांगितले होते की, हा मुकुट जोपर्यंत तुझ्या मस्तकावर आहे तोपर्यंत तुला मृत्युचे भय नाही असो; गणेशाराधन करून मोहिनीरूपी विष्णूने विरोचनाला स्वसौंदर्याने इतके मोहित केले की, मोहिनीने विनंति केल्याबरोबर मस्तकाला सुवासिक तैलाभ्यंग करण्यासाठी आपल्या मस्तकावरील मुकुट काढून ठेवण्याची परवानगी दिली. नंतर एका क्षणात विरोचनासुर हा विष्णुहस्ताने मृत्यु पावला हे सागावयास नकोच. याच व्रताच्या पुण्याईने विश्वसहनामक एका गणेशभक्ताने माघ महिन्यात एका नष्ट व पापी राक्षसिणीचा उद्धार केला.

## वैशाख, श्रावण व मलमासात सिद्ध झालेल्या गणेशव्रताचे माहात्म्य

सूत :– वैशाख, श्रावण व मलमास या महिन्यात सिद्ध झालेल्या गणपतिव्रताने इंद्राला वृत्रासुराचा वध करता आला. श्रावण महिन्यांत सिद्ध झालेल्या व्रताने रामचंद्राला लवणासुराचा वध व वैशाख मासांत सिद्ध झालेल्या व्रताने शंकराला जालंधराचा वध करता आला आणि मलमासांत सिद्ध झालेल्या व्रताने विष्णुप्रमुख देवांना गणपतीस प्रसन्न करून घेतां येऊन कलियुगांत अधर्मांचा नाश करता झाला.

## शास्त्रांचे रहस्य

सूत :– एकदां नैमिषारण्यामध्ये वसिष्ठ मुनि यज्ञ करीत असतां तेथे सर्व देवेंद्र, विप्रेंद्र व नानावर्णाश्रमांतील मुख्य जमा झाले होते.

महायोगी शुकही वसिष्ठयज्ञ पाहण्यासाठी आला होता सर्व प्रेक्षकांनी विनति केल्यावरून त्याने जमलेल्या सर्व देव दिकांस शास्त्रांचे रहस्य सांगितले. तें असेः- अन्नब्रह्म नावाचा रजोगुणी अन्नमय कोश हा स्थूलस्वरूपी व जागृतिविकारयुक्त आहे प्राणकोशाचे प्रकाशक प्राणब्रह्म, मनःकोशाचे प्रकाशक मनोब्रह्म, विज्ञानकोशाचे प्रकाशक विज्ञानब्रह्म, ही सूक्ष्मतर व सूक्ष्मतम असून स्वप्नरूप असतात. ही अंतःकरणांत राहतात. ही ब्रह्में म्हणजे सूक्ष्म देह व स्वप्नस्थितो यांची दर्शक होत. आनंदकोशात राहणारे आनंदब्रह्म दोन्ही ठिकाणी ( स्थूलसूक्ष्मांत ) समभावाने राहून सुषुप्तिरूप व कारणरूप असते. आत्मप्रत्यय देणारे चेतनासस्थ ब्रह्म चैतन्य नावाचे असते. याची अवस्था तुर्या आहे. हिला अस्मिता म्हणतात. हे नाददेहाचे प्रकाशक आहे. जीवाला जे चार देह ( स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण असे ) आहेत, त्यांच्या संयोगामध्ये देहात्मक धारक जे ( १ ) बिंदुमय ब्रह्म आहे तें 'त्वं' पदाच्या आश्रयाने राहते असे म्हणतात. कारण येथे उत्पति, स्थिति व नाश यांच्या संयोगवियोगाने उत्पन्न होणारे जे चार प्रकारचे देह असतात, त्यांच्या आश्रयाने म्हणजे देहाश्रयाने अथवा त्वंपदाच्या आश्रयाने हे ब्रह्म असते, म्हणून याला त्वंपदाश्रित म्हणतात. ( २ ) आतां सांगितलेल्या चार देहांच्यामध्ये विद्यमान असणारा, उत्पति, स्थिति, नाश विहीन असणारा चो सद्रूपी देही ( शरीरी ) असतो त्याला सोहं पदाचा ( तो मी आहे या वृत्तीचा ) आश्रय असतो. हा बिंदूच्या ( ह्मणजे प्रकृतीच्या ) मोहाने नानाप्रकरचा दिसतो, पण भ्रांतिनाश झल्यावर अभेदरूपी ह्मणजे एकरूपी, एकच असतो त्याला 'तत्पदाश्रय' अशी संज्ञा आहे. तात्पर्य, देहाभिमान असणे ही

जीवदशा ( त्वंपदस्थिति ) आहे आणि देहाभिमान शून्य असणे ही परमात्मस्थिति ( तत्पदस्थिति ) आहे. असो, या त्वंपदाख्य ( चतुर्विध देह धारण करणाऱ्या ) ब्रह्माचा आणि तत्पदाख्य ( चारो प्रकारचे देह अथवा तद्‌गुण नसणाऱ्या ) ब्रह्मांचा संयोग होणे म्हणजे अभेद होणे याला 'असिपद योग' असे म्हणतात. हा केवळ ज्ञानरूप आहे हा बाह्य नाहीं, अंतरंगांतील नाही, सम, नाही, अस्मिता नाही, बिंदु नव्हे, सोहंकाररूप नव्हें, व अभेदरूपही नव्हे. सारांश, हा बोध किंवा हे ज्ञानरूप 'नेति रूपानेच' दाखवितां येणार आणि ज्ञानरूपानेच कळणार. हा जेव्हां प्रकृतिपुरुषसंयोगरूपाने उत्पन्न होणाऱ्या सुखाचा ज्ञाता असतो व या उभयतांस उत्पन्नही करणारा होतो; म्हणजे हे दोन प्रकार ( वस्तु आणि वस्तुज्ञान ) म्हणजे द्वैत उत्पन्न करून तेथे क्रीडा करणारा हा परमात्मा असतो. हा परमात्मरूपी 'बोध' ( संप्रज्ञात योग ) स्वतःस स्वतःच्या क्रीडेसाठी स्वतःपासून निराळा करतो म्हणून याला 'स्वतः उत्थानक' असे ह्मणतात याच्या पलीकडे क्रीडाशून्य व बोधनाशयोगाने प्राप्त होणारे ( असंप्रज्ञात योगाने प्राप्त होणारे ) जे ब्रह्म त्याला 'विबोध' हे नांव आहे हे अवर्णनीय आहे. हे देह आणि देही यांच्यामधील जे अभेदात्मक ब्रह्म ह्मणजे सदात्मक ब्रह्म ( स्वत उत्थान ब्रह्म ) असते, ह्मणजे त्यांत देह आणि देही यांच्या अभेदाचे ज्ञान आहे, तथापि या ज्ञानात देह आणि देही यांचे द्वैत ज्ञानही असते. ) त्याच्या पलीकडचे जे अनुभव ज्ञान त्याला विबोधात्मक ब्रह्म ( पर उत्थानक ब्रह्म ) म्हणतात. विषयापासून ( विषयभ्रमापासून ) उत्पन्न होणारा जो बोध त्याचा नाश झाला अथवा विषयज्ञानात्मक ब्रह्माचा लय झाल्यानंतर विबोधाख्य ब्रह्माचा ( निःसंगब्रह्माचा ) उद्भव होतो. येथे शुद्ध आनदाचा अतिशय

आहे. हा स्वसंवेद्य आहे, येथे सर्व ब्रह्मांचा संयोग आहे; ह्मणजे येथे सर्व ब्रह्मे एकरूप होतात. हे संयोगाख्य ब्रह्म स्वरूपात्मक आहे म्हणून तें 'स्वतः उत्थान शून्य व परत उत्थान शून्य' असते, म्हणजे तें आपल्या स्वतःच्या मोठेपणामध्ये मात्र स्थित असते. याच स्वानंदवाचक ब्रह्माचे असत्, सत्, सम, नेति, स्वानंद असे पांच प्रकार आहेत. या पांच प्रकाराचे विवेचन आत्ताच तुम्हाला सांगितले आहे. या पांच प्रकारात योग्यांना जो भिन्न भिन्न अनुभव येतो तें तें त्या त्या प्रकाराचे नाव होते. अन्नब्रह्म हे सर्वकनिष्ठ आहे. येथे समाधि लागून अन्नब्रह्माच्या अनुभवाचा त्याग झाला म्हणजे जीवाला प्राणब्रह्माचा अधिगम होतो. याचप्रमाणे समाधि लावून मनोब्रह्म, विज्ञानब्रह्म व आनंदब्रह्म यांचा उत्तरोत्तर अधिगम होत जातो; आणि शेवटी सर्व नामरूपांचा व उपाधींचा लय होऊन मायाशून्य अशा परब्रह्माची प्राप्ति होते. (मुक्ति मिळते.) मायेचा नाश केवळ एक गणेशयोगामुळेच होतो. या योगाचे रहस्य तुम्हास मागे सांगितलेच आहे. श्रोत्यांनो! तुम्हास नित्य शांति हवी असेल तर गणेशयोगाची आराधना करून तो प्राप्त करून घ्या. गणेशयोगाच्या साहाय्याने मात्र ब्रह्मप्राप्ति म्हणजे शांति-प्राप्ति होते.

## श्रीगणेशभक्तीचे माहात्म्य

सूत :– पूर्वी एकदां गालव नावाचा तेजस्वीं व शापानुग्रहसमर्थ (शाप देण्यास व कृपा करण्यास समर्थ) एक ऋषिने पृथ्वीवरील सर्व तीर्थांची यात्रा केली व शेवटी आपला गुरु जो विश्वामित्र त्याच्या आश्रमात येऊन यात्रा पूर्ण केली. कांहीं दिवस तेथे राहिल्यावर त्याला विश्वामित्राने गणेशब्रह्माचे, गणेशस्वरूपाचे

व गणेशयोगाचे रहस्य सांगितले; आणि ' शक्ति, सूर्य, विष्णु, शंकर हे ईश्वर-स्वरूपी आहेत, तथापि ते सगुण आहेत म्हणून महा-प्रलयाच्या वेळी ब्रह्मामध्ये लय पावतात. पण सगुण असून निर्गुण, निर्गुण असून सगुण आणि सगुणनिर्गुणशून्य असा स्वानंदवासी नित्यशांत जो गणपति त्याचा केव्हांही नाश होत नाही. त्याला केव्हाही जन्म प्राप्त होत नाही. असा तो आहे म्हणून त्याला ' ज्येष्ठराज ' असे नाव आहे ' असे गणेशब्रह्माचे महत्वही सांगितले. पुढे गालवाला गणेशप्राप्ति व्हावी म्हणून विश्वामित्राने त्याला एकाक्षरी गणेशमंत्र दिला; आणि श्रावण महिन्यांत गालवाने हे पुरश्चरण केले म्हणून त्याला मयूरक्षेत्रांत राहून क्षेत्रसंन्यास घेण्याची बुद्धि झाली व तो महागणपतिभक्त झाला. श्रावण महिन्यांतील गणपतीच्या पूजनाचे माहात्म्य इतके आहे की, ब्रह्महत्त्यादि महापातके करणाऱ्या चांडा-ळांनी श्रावण महिन्यांत गणेशभक्ति केली तर त्यांची पापवृत्ति हळूहळू कमी होत जाऊन शेवटी ती नष्ट होते आणि पुण्यसंचय मोठा मोठा होत जाऊन शेवटी ते निष्कामकर्म व निष्कामभक्ति यांच्या साहाय्याने पूर्ण ज्ञान मिळवून घेऊन अंती स्वानंदवाही होतात.

## कली व गणेशपूजन

सुत :- मुनिहो ! कलियुगामध्ये तर कलिराजा आपले सर्व पापसैन्य बरोबर घेऊन मूर्तिमंत अवतीर्ण होतो. या कलीचा पराभव आपापल्या सामर्थ्याप्रमाणे कित्येक देव करतात, पण कलियुगाला गणपतीचा आश्रय आहे म्हणून कलीचा संपूर्ण नाश केव्हांही होत नाही हा कलिवृक्ष तोडला तरी पुनः वाढतच राहतो. या युगांत ज्या वेळी स्त्रिया दहाव्या वर्षी गर्भधारण करतील, मनुष्याचे तीस

वर्षेच आयुष्य होईल आणि सर्वत्र वर्णसंकर होईल, तेंव्हा कल्की अवतार धरून विष्णु कलीचा पराभव करील व धर्मसंस्थापना करील. पण जेव्हां पांचव्या वर्षी नारीला गर्भ राहील आणि सोळावे वर्ष हीच आयुष्याची मर्यादा होईल; तेव्हा शिवविष्णुप्रमुख देवांस अशक्य असा जो कलिनाश तो एक धूम्रवर्ण गणपतिच करूं शकतो. मलमासामध्ये विष्णूने गणेशपूजन केले ह्मणून त्याला कलीचा पराभव करता आला. धौम्यऋषीनेही शंकराजवळ जाऊन त्याच्याकडून गणेशस्वरूपाचे स्पष्टिकरण करून घेतले आणि मलमासात गणपतीचे यथाविधि पूजन केले. अर्थातच त्याला शांतियोगाची प्राप्ति झाली. मलमासांत गणेशपूजन केले असतां कोणत्याही वर्णातील जीवाचे पापविमोचन होते, इतकेच नव्हे तर पूर्वजन्मकृत पापांचे विनाशन होऊन शिवाय प्रारब्धकर्माने पिशाचयोनि प्राप्त झाली असेल तर तिचाही नाश होतो.

## नलराजाद्वारे गणेशपंचकपूर्वक द्वारयात्रेचे व गणेशव्रताचे अनुपालन

**सूत :–** निषध देशांतील नलराजाने श्रावण महिन्यांत प्रतिपदेपासून चार दिवसपर्यंत गणेशपंचकपूर्वक द्वारयात्रेचे व गणेशव्रताचे यथासांग अनुपालन केले व बारा ब्राह्मणाच्याद्वारा होमहवनयुक्त पुरश्चरण केले. सवाष्णींस व ब्राह्मणास विपुल दक्षणा दिली व वस्त्रालंकारही दिले म्हणून त्याला गणेशकृपेने वाटेल तेथे जाण्याचे सामर्थ्य प्राप्त झाले. शिवाय स्वानुभवी गणपतिभक्त असेही सांगतात की, गणेशध्यानपूर्वक गणेशव्रताचे एक अंग जरी सांगोपांग सिद्ध झाले तरी पुष्कळ कार्य होते आणि शेवटी शेवटी आपल्याला समग्र गणेशव्रताचे अनुपालन करता येते.

## इंद्राला लोमशऋषिचा उपदेश

सुत :– एकदां इंद्राने विश्वकर्म्याला आज्ञा केली की, उत्तम प्रकारचा व सर्वांगसुंदर असा एक प्रासाद माझ्यासाठी निर्माण कर. तसेच तेथे मागेपुढे पुष्कळ उद्यानेही असावी; व जलसचय असावा नंतर विश्वकर्म्याने वाटेल तितकी खटपट केली, पण इंद्राच्या पसतीला तो प्रासाद उतरेना. तेंव्हा विश्वकर्म्याने गणपतीचे स्मरण करून 'मला या तापत्रयांतून सोडव' अशी त्याची प्रार्थना केली त्याच दिवशी इंद्राच्या सभेत लोमशऋषि उपस्थित झाला. त्याने इंद्राला 'देहाच्या नश्वरत्वाविषयी व भोगाच्या दुःखपरिणामाविषयी' पुष्कळसे प्रवचन करून इंद्राची खात्री केली की, या विषयसुखापासून कोणत्याही प्रकारचे स्वार्थकल्याण होत नाही व परमार्थसाधनही सिद्ध होत नाही. नतर लोमशाने इंद्राला चातुर्मासांत केलेल्या गणशव्रताचे माहात्म्य, रहस्य व विधि ही सर्व सांगून त्याला गणेश-भक्त केले आणि त्याच्याकडून चातुर्मासांमध्ये गणेशभक्ति करवून त्याला स्वानंदवासी केले. ऋषिहो! ध्यानांत ठेवा की, स्वर्गवासी देवांना ज्या वेळी मुक्तीची इच्छा असते, त्यावेळी ते 'कर्मभूमी' वर येऊन चित्तशुद्धि करणारी कर्मे व मोक्ष देणारे गणेशब्रह्माचे ज्ञान ही संपादन करून घेतात आणि मुक्तिला वरतात.

## दृढभक्त बल्लाळची कथा

सुत :– सिंधु देशामध्ये पल्ली या नावाचे एक नगर होते. तेथे 'कल्याण' नामक वैश्य आपल्या इंदुमती पत्नीसह सुखाने राहात होता. हे दंपत्य स्वधर्माने वागणारे होते. त्यास बल्लाळ या नावाचा एक लहान मुलगा होता. बल्लाळ हा नेहमी गणनाथाचे ध्यान करीत

असे. त्याला तहानभुकेचीही मुळीच आठवण होत नसे. तो दुग्ध पानाकरिता केंव्हांही रडला नाही. त्याचे अखंड चिंतन गणपति-विषयक असे. हा बाळ रांगावयास लागला तेंव्हां आपणच मातीचा गणपति करून त्याला मातीचाच गंध, पुष्प, नैवेद्य दाखवी, हा मुलगा बोबडे बोलावयास लागला तेंव्हा प्रथम पासूनच 'विघ्नेशाचा जय असो' असे मोठ्या प्रेमाने म्हणत असे. त्याचे खेळावयाचे दिवस आले तेंव्हा आपल्या बरोबरीच्या मुलास खेळूं न देतां आपल्याबरोबरच त्यांस गणेशपूजा करावयास लावी. पुढे आपल्या पूजेपासून लोकांस त्रास होतो हे जाणून मुलांस घेऊन तो गांवाजवळ असणाऱ्या पर्वतावर जाई आणि तेथे पाषाणाची मूर्ति होती तिचे रानातील पत्र, फल व पुष्पांनी त्रिकाल पूजन करी. असा बरेच दिवस प्रकार चालला होता. पुढे बऱ्याच मुलांच्या आईबापांनी आपल्या मुलांस वनांत न जाण्याविषयी धाक दाखवून व मार देऊन पुष्कळ उपदेश केला; पण त्या मुलांनी काही ऐकले नाही. तेंव्हा सर्व आईबाप बल्लाळाचा बाप जो कल्याण त्याच्याकडे गेले व आपल्या तक्रारी सांगितल्या. 'आमची मुले तुझ्या मुलाच्या नादाने बिघडली ती उपवासाने दिवसें दिवस कृश होत चालली आहेत' ही त्यांची मुख्य तक्रार होती. 'आपल्या पोरास संभाळ, नाहीतर आम्ही त्याला मार देऊं' अशी धमकीही त्यांनी कल्याणास दिली. सर्व गांवांतील लोक आपल्याविरुद्ध रागावले आहेत असे पाहून कल्याण त्रासला आणि हातात काठी घेऊन मुलास मारण्याच्या हेतूने मुले जमत असत त्या जागी गेला. तेथे जाऊन पाहतो तो गवत व काटक्या यांनी चित्रविचित्र झालेले, अनेक प्रकारच्या रंगांनी सुशोभित झालेले गणपतीचे देवालय त्याचे दृष्टीस पडले. काही मुले

देवाला प्रदक्षिणा घालतात, काही नामसंकीर्तन करतात; कित्येक ध्याननिष्ठ बसले आहेत; कित्येक तपाचरण करत बसले आहेत; कोणी. पुराण वाचत आहेत; कोणी नृत्य करत आहेत; असा भक्तीचा सुंदर देखावा त्याच्या दृष्टीस पडला. त्याचा मुलगा बल्लाळ हा गणपतीच्या पुढे ध्यानस्थ बसला होता. हा देखावा पाहून कोणाही पुरुषाला कौतुक वाटले असते; पण कल्याण क्रोधवश झाला होता. तो देवालयाजवळ गेला आणि त्याने आपल्या काठीने देवालयाचा भंग केला. तें पाहून तो लहान बालके भिऊन पळून गेली एक बल्लाळ मात्र आपल्या आसनावरून ढळला नाही. त्याच्या बापाने त्याला हातात धरून ओढले, अंगांतून रक्ताच्या चिळकांड्या निघेपर्यंत काठीने त्याला झोडपले. तथापि त्याने आपल्या अंतःकरणांत जी गणेशमूर्ति स्थापन केली होती, तिला सोडून दिले नाही. त्याने गणपतीचे स्मरण अखंड ठेवले होते. कल्याणाने देवाची मूर्ति फेकून दिली आणि तेथें कांही वेलींचे दोर पडले होते त्यांनी मुलाचे हातपाय बांधून टाकले आणि त्याला म्हणाला 'मूर्खा! माझे न ऐकता तूं रोज देवाची पूजा करतोस त्याचे फळ भोग! लोक मला नित्य नावे ठेवतात आणि म्हणतात की, 'ह्या असल्या दुष्कीर्ती मिळविणाऱ्या पोराला मारून टाक.' आता तूं येथेच मर आणि विघ्नेश्वराकडे जाऊन काय तुझे कल्याण करून घ्यायचे तें करून घे.' असे बोलून त्या मुलाला दुष्ट कल्याणाने तेथेच टाकले आणि आपण घरी आला. पण घरी येंतांना त्याला महारोग झाला. तो आंधळा, बहिरा, मुका व आठ ठिकाणी वांकडा झाला. ही त्याची स्थिती पाहून बायकोला व त्याला अत्यंत खेद झाला, पण

तो मुका व बहिरा असल्याकारणाने त्याला विचारले तर कांही समजेना व बोलावयासही येईना. पुढे त्याच्या बायकोला इतर लोकांनी बनांतला वृत्तांत सांगितला, तेंव्हा मुलाला पाहण्याकरतां ती इंदुमती अरण्यांत गेली. इकडे तो बल्लाळ बापाने बांधून ठेवला होता तसाच होता. तो गणपतींचे स्मरण करीत आणि 'माझ्या भक्तिला असे विघ्न कां उत्पन्न झाले,' असे स्वतःस विचारींत पडला होता. 'प्राण गेला तरी गणपतींचे स्मरण विसरायचे नाही' असा त्याचा निश्चय होता. आपल्या देवाचा आपल्या बापाने अतिशय अपमान केला हीं गोष्ट मात्र त्याला सहन झाली नाहीं. या रागाच्या आवेशांत तो म्हणालाः 'माझा बाप कुष्ठयुक्त, आंधळा, बांकडा, मुका व बहिरा होवो आणि मला मात्र बंधमुक्त कर.' हें त्याचे म्हणणे शब्दशः खरें झालें. ब्राह्मणाचे स्वरूप घेऊन गणपति तेथे आले आणि त्यांनी त्याची सुटका केली. नंतर त्याने 'परमेश्वराची भक्ति असावी व गजाननाची भक्ति न करणाऱ्या पुरूषाविषयीं अनादर असावा' एवढे दोन वर मागितले. गणपतींनी त्याचे सर्व मनोरथ पूर्ण केले आणि त्याने जेथे पूजा केली होती, तेथेच आपण मूर्तिमंत राहून बल्लाळाच्या भावाचा स्वींकार केला. इतक्यांत मुलाचा शोध करीत व रडतच इंदुमती तेथे आली. पण आपला मुलगा सुखरूप आहे असें पाहून तिला फार आश्चर्य वाटले. बल्लाळाने आपल्या मातोश्रीस नमस्कार केला; परंतु तिला सांगितले की, 'गणेशद्वेषी जो माझा बाप आहे त्याचे दर्शन मी केव्हांही घेणार नाही.' त्याचा हा निश्चय पाहून

ती बिचारी घरी परत गेली आणि पतीची सेवा करीत घरी राहिली. वल्लाळ हा मरणानंतर स्वानंदवासी झाला. दयाळू परमेश्वराने बल्लाळाच्या बापाने केलेला पूजाभंग व देवखंडन यांचा विचार न करतां व बल्लाळाचे आईबाप हे आहेत असे जाणून, त्याच्या दुसऱ्या जन्मीं त्यांचा उद्धार केला.

## गणेशभक्ति कैवर्तकामुळे राक्षसांचा उद्धार

**सूत :–** शौनकादि ऋषिहो ! विभांडकऋषीला ऋष्यशृंग या नांवाचा ( याच्या कपाळावर एक शिंग होते, म्हणून त्याचे नांव ऋष्यशृंग होते. ) एक मुलगा होता. त्याने चातुर्मासामध्ये गणपतीचे विधिपूर्वक आराधन केले, म्हणून त्याचे सर्व मनोरथ पूर्ण झाले. फार काय सांगावे ? एका कैवर्तकाने कांही ब्राह्मण गणपतींचे चातुर्मासव्रत करीत आहेत असे पाहून त्यांस नमस्कार केला व त्यांच्याकडून तें व्रत व त्याचा विधि समजावून घेऊन तो घरी गेला व गणेशाच्या चातुर्मास व्रताला त्याने आरंभ केला. ह्या भजनपूजनाचा प्रभाव असा झाला की, त्याला खाऊन टाकण्याकरता कांही राक्षस त्याने अंगावर चाल करून आले होते, त्यांच्या अंगावर त्याने गणेश नामाने मंतरलेले पाणी टाकले मात्र, तो त्याबरोबर पूर्वजन्मांचे व पूर्वजन्मकृत पापांचे स्मरण होऊन त्यांना पश्चात्ताप झाला, ते रडूं लागले आणि हात जोडून त्याला त्यांनी विनंती केली की, 'आमचा उद्धार होईल असा मार्ग सांग.' ह्या कैवर्तकाने त्यांस सांगितले की. मी चातुर्मासव्रत करतो. 'मी आपल्या एका चातुर्मासाचे पुण्य तुम्हाला देतो. तुमचा उद्धार होईल.' असे

म्हणून त्याने संकल्पपूर्वक उदक सोडले. त्यानंतर लागलीच गणेशदूत तेथे आले आणि त्या राक्षसास गणेशलोकास घेऊन गेले. हा चमत्कार पाहून त्या कैवर्तकाची गणेशभक्ति दृढ झाली आणि तो यावज्जीव अखंड गणेशभक्ति करीत राहिला.

## गणपती नामाचे माहात्म्य

**सूत** :- जनमेजयाच्या सर्पसत्रामध्ये सर्पांचे संरक्षण करणारा आस्तिक या नावाचा एक ऋषी होता. सर्पांचे दुःख व तळमळ पाहून त्याला संसाराचा तिरस्कार उत्पन्न झाला आणि शांति मिळविण्याचा उपाय समजून घेण्यासाठी तो आपल्या बापाकडे (जरत्कारूनामक) गेला व 'मला शांति कशी मिळेल' असे त्याने त्यास विचारले. तेव्हां जरत्कारूने त्यास सांगितले की, तूं 'स्थावर' नामक नगरीमध्यें जा, तें चिंतामणीचे स्थान आहे, तेथें रहा, आणि चिंतामणीचे भजन कर. या क्षेत्रीं चित्त स्थिर होते म्हणून ह्या क्षेत्राला 'स्थावर' असे म्हणतात. असें म्हणून जरत्कारूनें गणेश-ब्रह्माचे रहस्य, गणेशयोग आणि गणेशव्रताचे माहात्म्य आपल्या मुलास सांगितलें. पुढें नाम माहात्म्य सांगतांना जरत्कारू म्हणाला गणपति या नावात 'ग्' हें शक्तिरूप आहे व 'अ' हा सूर्यरूप आहे. म्हणून शक्ति आणि सूर्य मिळून 'ग' हें अक्षर झाले. त्याच्या पुढील 'ण' या अक्षरांत 'ण्' हा विष्णू आणि 'अ' हा शंकर म्हणून विष्णू आणे शंकर मिळून 'ण' हें अक्षर सिद्ध होते. या सर्वांचा स्वामी तो 'गणेशान' किंवा गणपति आहे; किंवा (२) अवि-

जो बोध आहे (ज्ञानरूप बोधामध्यें (सांख्य नामक ब्रह्मामध्ये) आहे,) त्याचे नांव 'ग' हें आहे. आणि स्वानंदात्मक जी ब्रह्म आहे,) त्याचे नांव 'ग' हें आहे. यांचा स्वामि तो गणपति निवृत्ति आहे, तिचें नांव 'ण' हें आहे. यांचा स्वामि तो गणपति होय; (म्हणजे असद्ब्रह्मामध्यें व सद्ब्रह्मामध्यें राहणारे जे सद्सद्ब्रह्म त्याचे नांव 'ग' आहे, व नेतिरूपक जो स्वानंद आहे त्याचे नांव 'ण' आहे.) या चौघांचा जो स्वामी तो गणपति होय; अथवा (३) 'ग' पासून विश्वे उत्पन्न होतात आणि 'ण' पासून ब्रह्मे उत्पन्न होतात, या सर्वांचा जो स्वामी तो गणपति अथवा ब्रह्मणस्पति आहे. हा गणपति आपल्या भक्तांचा मोह नष्ट व्हावा म्हणून नामरूपधर होतो म्हणून गणपतीच्या नावाचा एवढा थोर महिमा आहे की, त्याच्यायोगाने अनंत जन्मांची अनंत पापे नाहीशी होतात. गणपतीला जे गजमस्तक आहे, त्याच्या दोन्ही गंडस्थलांत गणपतीच्या समष्टि व व्यष्टि रूपांचा अंतर्भाव होतो. त्याला जे तीन नेत्र आहेत, तेथे तीन ब्रह्मे (शक्ति, सूर्य व विष्णु) असतात. शुंडा हे तुरीय ब्रह्म (शंकर) होय हे व इतर सर्व मुखाचे अवयव ब्रह्मस्वरूप आहेत आणि गणपतीचे शरीर विश्वरूप आहे गणेशाची नांवे अनंत आहेत. तसेच विश्वे व ब्रह्मेही अनंत आहेत. या सर्वांचे भजन, पूजन व कीर्तन होणे जीवाला सर्वथा अशक्यच आहे. म्हणून दररोज एकशेआठ नावांचा तरी गणपतिभक्ताने विश्वासपूर्वक उच्चार करावा. विश्वास नसेल तर नामोच्चाराचे अर्धे फळ नाहीसें होतें व दंभाने गणेशनामाचा उच्चार केला तर तीनचतुर्थांश पुण्य नाहीसे होतें. विश्वासाला पूर्ण फळ मिळते.

सूत :- अधिकारी व अनधिकारी हा भेद पाहून व मनांत आणून वेदाने क्रममुक्तिचा मार्ग सांगितला आहे. ब्रह्मादि देव हे

तत्त्वरूप जे ब्रह्म त्याच्यापासून उत्पन्न झाले आहेत. अश्विनीकुमार हे नासिकेपासून उत्पन्न झाले आहेत. अश्विनीकुमारापासून पृथ्वीतत्त्व उत्पन्न झाले, यांत पृथ्वीचा गंध हा पुरुष आणि पृथ्वी ही प्रकृति आहे. ह्या दोघांचा योग हेंच अश्विनीकुमाररूपकब्रह्म आहे. सत्वरजादि त्रिगुणात्मक जे ब्रह्मादि जीव आहेत; त्यांचा देह पृथ्वीतत्त्वमय आहे. हा देह अश्विनीकुमारांनीच उत्पन्न केला. पृथ्वीचे विराटरूपही त्यांनीच उत्पन्न केले. याप्रमाणे ब्रह्मा व विश्व ही उत्पन्न झाली आहेत. ते अश्विनीकुमारापासून होतात, म्हणून पृथ्वीपासून होणारा जो भ्रम आहे त्याचा नाश करण्याकरिता अश्विनीब्रह्माचे रूप संपादन केले पाहिजे. याच्यापुढे वरुण ब्रह्माचा प्रदेश लागतो. याप्रमाणे ऊर्ध्वगामी क्रम सुरू ठेवला म्हणजे शेवटी स्वानंद ब्रह्माचा अधिगम होतो. परंतु हे सर्व प्राप्त होण्याला प्रथम साधकाने भक्तिपूर्वक गणेशनामाचा जप अखंड केला पाहिजे. हे गणेशब्रह्माचे, योगाचे व नामाचे माहात्म्य ऐकून आस्तिकाने गणेशब्रह्माची आराधना करून शांति मिळविण्याचा निश्चय केला हाच उपदेश शंकरांनी उपमन्यूला केला होता. हा उपदेश ऐकल्यावर मात्र उपमन्यूला आस्तिकाप्रमाणेच गणपतीविषयी आदर उत्पन्न झाला. आणि त्याने आस्तिकाप्रमाणे गणेशपूजन करून शांतियोग साध्य करून घेतला.

## आश्विन शुद्ध दशमीला शमीपूजन करण्याचे कारण

सूत :- अश्विन शुद्ध दशमीला संध्याकाळी जे शमीपूजन करतात त्याचे कारण हे आहे की, शंखासुराला मारून विष्णूने सर्व वेद ब्रह्मदेवाच्या स्वाधीन केल्यावर त्यांच्या निर्विघ्न संरक्षणार्थ ब्रह्मदेवाला गणपतीने 'दशहारा दशमीला शमीपूजन करा' असा

उपाय सांगितला. दाहीकडून येणाऱ्या विघ्नांचा नाश होतो म्हणून
या दशमीला दशहरा दशमी म्हणतात. या दिवशी देवांनीं शमीची
व गणपतीची पूजा केली व याप्रमाणे वेद राखले.

## ईश्वर आणि विश्व

सूत :– ऋषिहो ! हे विश्व कर्माधीन आहे असे कोणी म्हणतात, कोणी ईश्वराधीन आहे असे म्हणतात, आणि कोणी यदृच्छेने हा सर्व व्यापार चालतो असे म्हणतात. तिघांच्याही म्हणण्यांत सत्याचा अंश आहे. परमेश्वराच्या इच्छेने हा सर्व विश्वाचा खेळ चाललेला आहे. परमेश्वराला प्रेरणा करणारा कोणीही नाही म्हणून त्याचे सर्व कारभार यदृच्छेने होतात. यदृच्छेने सर्व कारभार चालतो म्हणून तिसऱ्या पक्षांत खऱ्याचा अंश आहे; माया ही परमेश्वराला सुद्धां मोह उत्पन्न करणारी आहे; ती नित्य खेळणारी आहे. तिची भक्ति अनेकत्त्वावर आहे आणि परमेश्वराने जोपर्यंत मायेचा अंगिकार केला आहे तोपर्यंत ती जशी खेळवेल त्याप्रमाणे परमेश्वर खेळतो. येथे दुसऱ्या पक्षांत सत्याचा अंश आहे, कारण सर्व कांही माया करते. मायेचा त्याने तिरस्कार केला म्हणजे त्या जड मायेला कांही एक करता येत नाही. यावरून परमेश्वराच्या स्वाधीन सर्व आहे, या म्हणण्यांतही सत्याचा अंश आहे. पुनः असेही ध्यानांत ठेवावयास पाहिजे की, माया ही कर्मस्वरूपिणी आहे. कर्म तीन प्रकारचे; एक स्वर्गसुख देणारे, दुसरे मुक्ति देणारे व तिसरे नरकात घालणारे, असे हे कर्माचे तीन प्रकार आहेत. जीव कर्म करतो, त्याप्रमाणे त्याला फळ मिळते. हा नियम सर्वथा अबाधित आहे. यावरून कर्माच्या स्वाधीन सर्व विश्व आहे हेही खरे आहे. देहवाबी

जे आहेत ते कर्माधीन जगत् आहे असे म्हणतात. अद्वैतवादी सर्व ईश्वराधीन आहे असे म्हणतात आणि योगी जे आहेत ते यदृच्छेने विश्व चालले आहे असे म्हणतात.

**सूत :–** मुनिहो ! श्रावणामध्ये गणेशाची, भाद्रपदात मयूरेशाची, अश्विनांत विघ्नेशाची, कार्तिकांत वक्रतुंडाची, मार्गशीर्षांत विकटाची, पौषांत लंबोदराची, माघांत गणेशाननाची, फाल्गुनांत गणेशाची, चैत्रांत धूम्रवर्णाची. वैशाखांत हेरंबाची, ज्येष्ठांत विनायकाची व आषाढात गजाननाची भक्तिपूर्वक सेवा केली असतां भक्ताचे सर्व मनोरथ पूर्ण होतात.

## गणेश ध्यान व प्रार्थना

**सूत :–**शंकरांनी ‘ गंगेला गणेशहृदयस्तोत्र ’ सांगितले. या हृदयाचा जप करण्याला आरंभ करण्याच्या आधी ‘ साधकाने सिंदुरवर्ण त्रिनेत्र, लंबोदर, रक्तवस्त्र, पाशांकुशधर, वरद, अभय, अभयकर, सिद्धिबुद्धिपति, गजवदन, एकदंत, नाभिशेष, अलंकारयुक्त, भक्तवत्सल ’ अशा स्वरुपाने ध्यान करावे. नंतर ॐ गणेश, एकदंत, चिंतामणि, विनायक, ढुंढीराज, मयूरेश, लंबोदर, गजानन, हेरंब, वक्रतुंड, ज्येष्ठराज, आशापुरक, वरद, विकट, धरणीधर, सिद्धिबुद्धिपति, ब्रह्मणस्पति, मांगल्येश, विघ्ननायक, सर्वपूज्य, निजस्थित ही गणपतीची एकवीस नावे त्याचे हृदय होतात. त्यांचे ध्यान करावे. ही जी एकवीस नावे दिली आहेत यांचा अर्थ तज्ज्ञांकडून समजून घेऊन ध्यानांत ठेवावा; नंतर पुरश्चरणाच्या विधीने हृदयमंत्राचे ग्रहण करून भजन केले म्हणजे ज्ञान उत्पन्न होते यांत शंका नाही. गंगेने याप्रमाणे तपश्चर्या केली व गणपतीस प्रसन्न करून घेतले. या योगाने तिला ज्ञान झाले आणि ती गणेशाचे भजन करीत आनंदाने राहिली.

शंकर म्हणतात, गणपतीची प्रार्थना करावयाची ती अशी असावी. ' हे गणपते ! पुत्र, कलत्र, मातापितर, मित्र, द्रव्य, स्नेही, जीवनविद्या, स्वर्ग, मोक्ष, हे सर्व मला तूंच आहेस. तूं माझा स्वामी आहेस. जे काय मी कायिक, वाचिक, मानसिक कर्म करतो व जे ज्ञान मिळवितो, ते सर्व हे विघ्नेश्वरा ! तुझ्या चरणी अर्पण करतो. एक व अनेकांमध्ये योगरूपाने राहून अनेक प्रकारचे भोग तूं भोगतोस. आम्ही सर्व जीव, स्वतंत्र नाही. तुझे सेवक आहोत आणि सर्व विश्वभर तूंच खेळत आहेस ' याप्रमाणे योग्यांनी नित्य प्रार्थना करावी. या प्रार्थनेचे फल गणपति लौकरच देतो.

नंतर दक्षाने विचारल्यावरून मुद्गलाने पुनः एकदा गणेशब्रह्माचे स्वरूप सांगितले व गणेशयोगाची प्रक्रियाहि सांगितली.

मुनिहो ! हे स्वरूप आणि ही प्रक्रीया मी तुम्हास पूर्वीच सांगितली आहे, ती ध्यानात ठेवून गणेशब्रह्माचे ज्ञान करून घ्या व गणेशयोगाचे अनुपालन करून विज्ञान संपादन करा. ज्यांनी ज्यांनी याप्रमाणे भक्तिपूर्वक आणि योगतत्वानुसार गणेशब्रह्माचे ज्ञान करून घेतले, ते भक्त इहलोकी सुखी झाले, एवढेच नव्हे तर त्यांस परमार्थही साध्य होऊन ते स्वानंदवासी झाले.

[ इति धूम्रवर्णचरित्र समाप्त ]